गालीना लेबेदेवा

# उशी झाली नकोशी !

अनुवाद : अनिल हवालदार
चित्रे : बरीस मार्केविच

आईने आपली मुलगी मारीया हिला बिछान्यात निजविले. मारीयाचे लाडके नांव होते माशा. दिवा मालवून आई शेजारणीकडे गेली.

माशा खूप वेळ बिछान्यात पडून राहिली, पण तिला काहीकेल्या झोप येईना. पहिल्यांदा तिला उकडू लागले, मग गादी कडक वाटू लागली, उशी खूप उंच वाटू लागली, तर नंतर खूप सखल वाटू लागली. माशाला खूप राग आला आणि उशीला बुक्के मारीत ती म्हणाली:

"शी:, ढोली कुठली, उकडणारी!"

मग तिने लाथा झाडायला सुरुवात केली. पांघरूण खाली फरशीवर पाडून ती म्हणाली:

"आणि तूही चालता हो, जड टोचणाऱ्या!"

माशा पलंगावरून खाली उतरली आणि पाय आपटत ओरडली:



"ह्या पलंगाचा मला वीट आलाय! झोप झोप झोपून रहायचं! कंटाळा आला!"

पायात सपाता चढवून हळूच ती खोलीबाहेर पडली. दाराला कडी लावलेली नव्हती असे तिला आढळले. माशा उभी राहिली आणि तिने कानोसा घेतला... मग हळूच पायऱ्या उतरून बाहेर बागेत गेली.

"अय्या, न झोपण्यात कित्ती गंमत वाटते! अय्या, न झोपण्यात कित्ती गंमत वाटते!" एका पायावर लंगडी घालीत ती म्हणाली.

माशा पाऊलवाटेवरून पळत गेली. तेवढ्यात कुत्र्याच्या घरामधून त्यावका कुत्रा भुंकला:

"गुर्रर्रं, भू:! कोण आहे?"

"मी, माशा!"

"तू झोपली का नाहीस? खूप उशीर झालाय."

"माझा पलंग चांगला नाही, आरामशीर नाही... मला त्याचा राग आलाय. म्हणून झोपायला जात नाही."

"बरोबर आहे तुझं," त्यावका म्हणाला. "त्यापेक्षा माझ्या घरात झोपणं सर्वांत उत्तम! गादीवर अंग टाकून कूस वळवली – गाढ झोप! चल–ये आत!"

"अय्या, कित्ती मज्जा!" माशाला खूप आनंद झाला.

गुडघ्यावर वाकून ती कुत्र्याच्या घरात शिरली. कुशीवर वळण्याचा तिने प्रयत्न केला. पण जमले नाही. खूप कडक, दाटी. त्यावकाने आपले डोके घरात घुसविले. त्याच्या तोंडात हाडूक होते.

"हे घे तुला हाडूक," त्यावका माशाला म्हणाला, "त्यामुळं झोप छान लागते."

"आभारी आहे त्यावका," माशा म्हणाली आणि कुत्र्याच्या घराबाहेर परत आली. "तुझं घर खूप छान आहे, पण त्यात झोपायची मला इच्छा नाही."





"फारच नखरेबाज आहेस!" रागावून त्यावका म्हणाला.

त्यावका आपल्या घरात शिरला व माशा कोंबड्यांच्या खुराड्याकडे धावली. पंचरंगी कोंबडीने तिच्यासाठी ठिपकेदार अंडे घातले होते अथवा नाही हे पहायला. माशाने दरवाजा उघडताच पेत्या कोंबड्याने पिसे फुलविली, मान इकडे-तिकडे फिरविली:

"काय पाहिजे तुला?" कठोर आवाजात त्याने विचारले.

"पेत्या कोंबड्या, पंचरंगी कोंबडीनं माझ्यासाठी ठिपकेदार अंडं घातलं किंवा नाही हे पहायला मी आल्येय," माशा म्हणाली.

"तुला थो-थो-थोडा धीर ध-ध-धरवत नाही?" कोंबडा संतापून ओरडला. "रोज फक्त पांढरी अंडी घालतात. ठिपकेदार अंडं क्वचित मिळतं. जा, जाऊन झोप मुकाट!"

"मला झोप येत नाही!"

"का?"

"माझा पलंग मला आवडेनासा झालाय. मुळीच चांगला नाही."

"खरं आहे. त्यापेक्षा आडवा दांडा छान!" कोंबडा म्हणाला. "एकमेकांना लगटून बसायचं, पिसं फुलवायची आणि झोप काढायची. झकास! चढून वर ये आमच्यापाशी!"

माशा कशीबशी आडव्या दांड्यावर चढली. अंगाची मुटकुळी करून ती बसली. एका बाजूने कोंबडी तिला ऊब देत होती, तर दुसऱ्या बाजूने कोंबडा. खरेच, खूप उबदार वाटत होते. माशाला डुलकी लागली आणि त्याच क्षणी ती दांड्यावरून तोल जाऊन खाली पडली.

घाईघाईने कोंबड्यांच्या खुराड्यातून माशा बाहेर पडली आणि व्हरांड्यात बसली. अचानक



एक पक्षी उडत उडत आला आणि धप्प! तिच्या मांडीवरच येऊन बसला. माशाने पाहिले — हा कसलातरी विचित्र पक्षी होता.

"नमस्ते," माशा म्हणाली. "तुम्ही कोण?"

"मी वटवाघुळ. दिवसा मी तुमच्या पोटमाळ्यावर झोपतो आणि रात्री उडतो. पण तू का झोपत नाहीस?"

"माझा पलंग चांगला नाही."

"खरंच, मला तुझी दया येते," वटवाघुळ सुस्कारा टाकीत म्हणाले. "तुला हवं तर मी मदत करतो."

"करा," आनंदून माशा म्हणाली.

"तर मग माझ्या पाठोपाठ पोटमाळ्यावर ये."

वटवाघुळाने पंख फडफडविले आणि छोटया खिडकीमधून ते उडत उडत पोटमाळ्यावर जाऊन पोहोचले. माशा लाकडी जिना चढून पोटमाळ्यावर पोहोचली.

"ही माझी झोपायची खोली," वटवाघुळ म्हणाले.

"तुमचा पलंग कुठं आहे?" माशाने विचारले.



"तीच तर गंमत," हसून वटवाघुळ म्हणाले. "पलंगाशिवायच मी झोपतो. त्या छताखालच्या आढ्यावर जायचं आणि खाली डोके वर पाय करून टांगून घ्यायचं. चल वर, माझ्या आवडत्या खिळ्याला धरून कसं टांगून घ्यायचं ते दाखवतो."

खुराड्यांमध्ये दांड्यावरून आपण कसे पडलो याची माशाला आठवण झाली व तिने आपला दुखरा गुडघा चोळला.

"कशी झोपणार मी तिथं?" तिने विचार केला. "डोकं खाली करून? मी नक्की खाली पडणार! आणि इथं कोंदट वास येतोय..."

"कुठं आहेस तू?" वटवाघुळाने हाक मारली.

माशाने काहीच उत्तर दिले नाही व चोरपावलांनी लाकडी जिन्याच्या पायऱ्या उतरायला तिने आरंभ केला. बागेतील कुंपणाच्या भोकामधून वाकून ती तळ्याकडे गेली. घाबरून बेडक्या ओरडायच्या थांबल्या आणि डुबुक! डुबुक! त्यांनी पाण्यात उड्या मारल्या. म्हाताऱ्या बगळ्याने घाबरून पंखांची फडफड केली, पण तेथे फक्त एक छोटी मुलगी पाहताच तो शांत झाला.

"इथं कशाला भटकते आहेस आणि माझ्या बेडकांना घाबरवते आहेस?"

"मला झोपायचं नाही."

"खॉक! खॉक! खॉक!" थंडीची बाधा झालेला बगळा खोकला. "मला वाटलं की, माझ्यासारख्या म्हाताऱ्यांना फक्त रात्रीची झोप येत नाही. दमटपणामुळं सांधे दुखतात. तुझं काय दुखणं आहे?"

"काही नाही," माशा अवघडून म्हणाली. "फक्त रोज रात्री झोपायचा खूप कंटाळा आला."

"बरोबर, कंटाळा येतो, माझ्यावरून ठाऊक आहे... तर मग... त्या दगडांवर चढून ये माझ्यापाशी, आपण मैत्री करू. तुला बेडकांची मेजवानी देतो. मग अंधारात एका पायावर शेजारी शेजारी उभे राहू. मी तुला पंखांखाली झाकीन."



"मला बेडकांची भीती वाटते," माशा केविलवाण्या आवाजात विव्हळली. "आणि पाणी ओलं आहे! ... तुझ्या घरात मी नाही झोपणार!"

"रडवी पोरगी!" चिडून बगळा म्हणाला. "चालती हो इथून, तावडतोब! माझ्या संगतीला इथं भरपूर दमटपणा आहे. त्यात आणखी तुझी गरज नाही!"

माशा घरी परत निघाली.

"बेडकांच्या तळयात झोपायचं कसं? तिथं किती ओल आहे आणि थंडी?" तिच्या मनात विचार आला. "आत्ता बिछान्यात, गरम पांघरूणात झोपायला कित्ती छान वाटेल... पांघरूण मुळीच टोचत नाही, उलट खूप छान आहे. आणि उशीसुद्धा कित्ती मऊ मऊ!"



माशा घरात आली.

स्वत:च्या झोपायच्या खोलीत ती हलक्या पावलांनी शिरली. फरशीवर पडलेले पांघरूण तिने उचलले, उशी नीट जागेवर ठेवली आणि आपल्या मऊ मऊ गादीवर ती टुणकन चढली.

जांभई देत ती म्हणाली:

"माझ्यासारखा सुंदर बिछाना या सबंध जगात दुसऱ्या कुणाचाही नाही!"

